**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत देखभाल व दुरूस्तीकरिता अनुदान वाटप ...**

**महाराष्ट्रशासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासननिर्णयक्रमांकः ग्रापापु-२०१८/प्र.क्र.७२/पापु-१०**
७ वा मजला ,गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग,मार्केट जवळ ,मुंबई -४०००१
तारीखः १६ फेब्रुवारी, २०१९

**वाचा-**१.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासननिर्णयक्रमांकःग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-७ दिनांक १७ ऑक्टोबर २०१४

२.ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकःझेडपीए-२०१६/प्र.क्र.५६/वित्त-९, दि.०७ ऑक्टोबर २०१७

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये मागणी क्र.वाय -०२,लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम,(०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने,(०२),(०१६) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना - देखभाल व दुरूस्ती यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनोत्तर ) (२२१५-२०८२ ) या राज्य हिश्श्याच्या लेखाशिर्षाखाली देखभाल व दुरूस्तीसाठी अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासननिर्णय-**

आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल व दुरूस्तीकरीता लेखाशिर्ष २२१५-२०८२ खाली उपलब्ध असलेला रू. ५० लक्ष ( अक्षरी रुपये पन्नास लक्ष फक्त) इतके अनुदान ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल व दुरूस्तीसाठी जिल्हा परिषद रत्नागिरी यांना खालील अटीच्या अधिन राहून निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BEAMS)मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

अ.संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.या शासन निर्णयातील अटी व शर्तीची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणाकडून पूर्तता होत आहे,याची शासनाला खात्री करून घेता यावी,यासाठी महालेखापाल,महाराष्ट्र -१/२/,मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यांना लेखे पाहण्याचा अधिकार राहील.तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

आ.शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र.आरसीएन -१८९/सी.आर-३०२७/२८, दि.५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखालाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व माळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी विभागीय आयुक्त,(विकास शाखा ) यांना व कार्यासन पापु-१० /पापु-२० पाणी पुरवठा व स्वच्छता

विभाग,मंत्रालय,मुंबई यांना सादर करावे. त्याच प्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय,मुंबई /नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

इ. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार देखभाल व दुरूस्ती याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च १०० % राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

२. यावर होणारा खर्च मागणी क्र.वाय -०२,लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ,०१ पाणी पुरवठा,१०२,ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम,(०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदान,(०२) (०१६) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना - देखभाल व दुरूस्ती यासाठी अनुदाने,३१ सहाय्यक अनुदाने (वेतनोत्तर ) (२२१५ -२०८२ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ८ व क्र. ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१६१२२७४२०९२८असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Gorakh Bharate

Digitally signed by Ravindra Gorakh Bharate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, serialNumber=fd232eb47eb633cb760c7bd2acf421b01b1da040dc965254760018b5f4e33be5, cn=Ravindra Gorakh Bharate
Date: 2019.02.16 15:28:52 +05'30'

डॉ. रविंद्र गो. भराटे
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र,-१ मुंबई (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता),
२. महालेखापाल ,महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता),
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता )यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई,
४. सदस्य सचिव ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई,
५. नियोजन विभाग (कार्यासन -१४४३)/वित्त विभाग (व्यय-३ ) ,मंत्रालय ,मुंबई,
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, रत्नागिरी.
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी ,जिल्हा परिषद, रत्नागिरी.

८. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,नवी मुंबई,बेलापूर,
९. कार्यकारी अभियंता ,ग्रामीण पाणी पुरवठा जिल्हा परिषद, रत्नागिरी.